**आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे या कार्यालयातील तसेच त्यांच्या अधिपत्याखालील १५ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती कार्यालयातील एकूण ३५८ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यत मुदतवाढ देण्याबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. : अस्थाप-२०२१/प्र.क्र.४८/का-७,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक: २१ सप्टेंबर, २०२१.

वाचा :-
१. शासन निर्णय आदिवासी विकास विभाग, क्रमांक: अस्थाप-२०१९/ प्र.क्र.२२/ का-७, दि.२५.०३.२०२१.
२. शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्रमांक: एसटीसी-२११९/ प्र.क्र.३४/का-१०, दि.१३.०९.२०१९.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे पत्र क्रमांक: आस्था-२०२१/प्र.क्र.६८(भाग-२)/का-१/२९२, दि.१२.०८.२०२१.
४. शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांक: पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१.

**प्रस्तावना:-**

आदिवासी विकास विभागाच्या अधिपत्याखालील आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालयातील व त्यांच्या अधिनस्त असलेल्या अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती कार्यालयातील एकूण २८८ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये दि.०१.०३.२०२१ ते दि.३१.०८.२०२१ पर्यत मुदतवाढ देण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये पुर्वीच्या ०८ समित्यांव्यतिरिक्त नव्याने ०८ समित्या निर्माण करुन त्याकरीता ७० नवीन पदे निर्माण करण्यास मंजुरी देण्यात आली आहे. सदर एकूण ३५८ पदांची मुदत संपल्याने आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांनी संदर्भ क्र.२ अन्वये प्रस्तावित केल्यानुसार व वित्त विभागाच्या संदर्भ क्र.३ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकाराचा वापर करुन आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालयातील व त्यांच्या अधिनस्त असलेल्या एकूण १५ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती कार्यालयातील पुर्वीच्या २८८ पदांना व नव्याने निर्माण केलेल्या ७० अशा एकूण ३५८ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे यांचे कार्यालयातील व त्यांच्या अधिनस्त असलेल्या १५ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती कार्यालयातील पुढील कोष्टकात नमूद केलेल्या एकूण ३५८ अस्थायी पदांना **दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यंत** या शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **पदनाम** | **वेतनश्रेणी** | **पदांच्या आढाव्यानंतर सुधारित आकृतीबंध नुसार मंजूर पदांपैकी अस्थायी पदे** |
|---|---|---|---|
| १. | सहआयुक्त | एस-२५: ७८८००-२०९२०० | ०८+७ * |
| २. | सहसंचालक | एस-२५: ७८८००-२०९२०० | ०१ |
| ३. | उप संचालक (सं) | एस-२३: ६७७००-२०८७०० | ०७+७ * |
| ४. | विधी अधिकारी | एस-२३: ६७७००-२०८७०० | ०८ |
| ५. | वरिष्ठ संशोधन अधिकारी | एस-२०: ५६१००-१७७५०० | १४+७ * |
| ६. | पोलीस उप अधिक्षक | एस-२०: ५६१००-१७७५०० | ०८+७ * |
| ७. | प्रबंधक (रजिस्टार) | एस-१५: ४१८००-१३२३०० | ०८ |
| ८. | संशोधन अधिकारी | एस-१५: ४१८००-१३२३०० | २३+१४ * |
| ९. | पोलीस निरीक्षक | एस-१८: ४९१००-१५५८०० | ३८+१४ * |
| १०. | संशोधन सहायक | एस-१४: ३८६००-१२२८०० | १४ |
| ११. | कनिष्ठ प्रशासकीय अधिकारी | एस-१४: ३८६००-१२२८०० | ०८ |
| १२. | निम्नश्रेणी लघुलेखक (मराठी) | एस-१४: ३८६००-१२२८०० | ०६ |
| १३. | निम्नश्रेणी लघुलेखक (इंग्रजी) | एस-१४: ३८६००-१२२८०० | १५ |
| १४. | लघुटंकलेखक | एस-८: २५५००-८११०० | ०९ |
| १५. | सांख्यिकी सहायक (क) | एस-८: २५५००-८११०० | ०१ |
| १६. | लिपिक-टंकलेखक | एस-६: १९९००-६३२०० | ५२ |
| १७. | अभिलेखपाल (रेकॉर्ड किपर) | एस-६: १९९००-६३२०० | ०८ |
| १८. | पोलीस शिपाई | एस-७: २१७००-६९१०० | ३८+१४ * |
| १९. | वाहन चालक | एस-६: १९९००-६३२०० | ०६ |
| २०. | शिपाई | एस-१: १५०००-४७६०० | १६ |
| | | **एकूण** | **३५८** |

* संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये नव्याने निर्माण केलेली ७० पदे.

२. सदर ३५८ अस्थायी पदांवरील वेतनादी भत्याचा खर्च खालील कोष्टकात नमूद करण्यात आलेल्या संबंधित लेखाशिर्षाखाली खर्च करण्यात यावा आणि तो मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

| **अ.क्र.** | **सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात ज्या लेखाशिर्षाखाली खर्च करावयाचा आहे तो लेखाशिर्ष** |
|---|---|
| १. | मागणी क्रमांक टी-५,<br>२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-पंचवार्षिक योजनांतर्गत योजना-जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना-०२-अनुसूचित जमातीचे कल्याण-राज्य योजना -००१-संचालन व प्रशासन (०१) (०१) नियोजन व संनियंत्रण शाखा- जनजाती संशोधन व प्रशिक्षण संस्था (२२२५ ४१२२) |

| अ.क्र. | सन २०२०-२१ या वित्तीय वर्षात ज्या लेखाशिर्षाखाली खर्च करावयाचा आहे तो लेखाशिर्ष |
|---|---|
| २. | मागणी क्रमांक टी-२,<br>२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण-२७७-शिक्षण-०५ संशोधन व प्रशिक्षण संस्था (१) (ए) जनजाती संशोधन व प्रशिक्षण संस्था (२२२५ १३०१) |
| ३. | मागणी क्रमांक टी-२,<br>२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण व ०२- अनुसूचित जमातीचे कल्याण -००१ संचालन व प्रशासन (०४) एकात्मिक क्षेत्र विकास कार्यक्रम (२२२५ १०५२) |
| ४. | मागणी क्रमांक टी-५,<br>२२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण-०२-अनुसूचित जमातीचे कल्याण- ७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना ०२- जनजाती क्षेत्राबाहेरील उपयोजना (०२) २४ अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती (कार्यक्रम) (२२२५ ४१२२) |

३. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.१०.०८.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागाना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०२१०९२११२५०४६३१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Yogesh Anant Sawant
Date: 2021.09.21 12:55:59 +05'30'

**( यो. अ. सावंत )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे,
२. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक,
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे / नागपूर / नाशिक / अमरावती,
४. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), (महाराष्ट्र -१) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), (महाराष्ट्र -२) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
६. महालेखापाल (लेखापरिक्षा), (महाराष्ट्र -१) महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. महालेखापाल (लेखापरिक्षा), (महाराष्ट्र -२) महाराष्ट्र राज्य, नागपूर,
८. सर्व सहआयुक्त तथा उपाध्यक्ष, अनुसूचित जमाती प्रमाणपत्र तपासणी समिती,
९. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१२. कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१३. कक्ष अधिकारी (का.१५), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१४. वित्त विभाग (व्यय-१४/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई,
१५. निवड नस्ती (का.७).